**महाबळेश्वर तालुक्यातील ग्रामीण रुग्णालय आणि तळदेव व तापोळा ही दोन प्राथमिक आरोग्य केंद्रे व त्या अंतर्गत येणारी १४ उपकेंद्रे प्रायोगिक तत्वावर ५ वर्षाकरीता चालविण्यास देणेबाबत.**

**महाराष्ट्रशासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुदतवाढ-२०२३/प्र.क्र.१२२/आरोग्य-४,**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ०७ जून,२०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१२९/आरोग्य-४,दि २७.०३.२०१८
२) शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.९९/आरोग्य-४,दि १२.०६.२०२०
३) शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१९४/आरोग्य-४,दि ०७.०९.२०२०
४) शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०२०/प्र.क्र.४४/आरोग्य-३,दि ०७.०६.२०२१
५) शासन निर्णय क्रमांक : एनएचएम-११२०/प्र.क्र.८३/आरोग्य-७,दि २८.०७.२०२१
६) आरोग्य सेवा संचालनालयाचे क्रमांकः आआसे/कक्ष-७अ/टे-२/नस्ती क्र.६९/सातारा प्राआके तळदेव तापोळा/मुदतवाढ/२०२३/३१२२-२६, दि.२६.०४.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

प्राथमिक आरोग्य केंद्र तळदेव व तापोळा व त्या अंतर्गत १४ उपकेंद्रे प्रायोगिक तत्वावर चालविण्यास इंडियन रेड क्रॉस सोसायटी, पाचगणी (महाबळेश्वर) जि.सातारा संचलीत बेल-एअर रुग्णालय या संस्थेस पुढील पाच वर्ष (दि.३१.०३.२०२८ पर्यंत) मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

ग्रामीण रुग्णालय, महाबळेश्वर,जि. सातारा आणि प्राथमिक आरोग्य केंद्र, तळदेव तापोळा व त्या अंतर्गत १४ उपकेंद्रे इंडियन रेड क्रॉस सोसायटी,पांचगणी (महाबळेश्वर),जि.सातारा संचलीत बेल-एअर हॉस्पिटल या संस्थेस, ५ वर्षाच्या कालावधीकरीता दि.३१.०३.२०२८ पर्यंत प्रायोगिक तत्वावर चालविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर मान्यता खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे :-

१) ग्रामीण रूग्णालय, महाबळेश्वर आणि प्राथमिक आरोग्य केंद्र, तळदेव व तापोळा, ही रूग्णालये व त्या अंतर्गत १४ उपकेंद्रे इंडियन रेड क्रॉस सोसायटी संचलीत पांचगणी (महाबळेश्वर), जि.सातारा येथील बेल-एअर हॉस्पिटल या संस्थेस जसे आहे तसे ५ वर्षासाठी हस्तांतरीत करण्यात यावे.

२) सदर रूग्णालयात केवळ वैद्यकीय सेवा व राज्य शासन पुरस्कृत आरोग्य विषयक कार्यक्रम यांची अंमलबजावणी करणे या संस्थेवर बंधनकारक राहिल.

३) राष्ट्रीय कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने शासनाने (आरोग्य सेवा संचालनालयाने) तयार केलेल्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे काम करणे या संस्थेला बंधनकारक राहिल.

४) केंद्र शासनाने / राज्य शासनाने विविध स्तरावर राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रम यशस्वी करण्याच्या दृष्टीने काही वार्षिक उद्दिष्टेही दिली आहेत, ती उद्दिष्टे पूर्ण करणे इंडियन रेड क्रॉस सोसायटी संचलीत पांचगणी (महाबळेश्वर), जि.सातारा येथील बेल-एअर हॉस्पिटल या संस्थेला बंधनकारक राहिल.

५) इंडियन रेड क्रॉस सोसायटी संचलीत पांचगणी ( महाबळेश्वर ), जि.सातारा येथील बेल-एअर हॉस्पिटल या संस्थेला प्रशासकीय व तांत्रिक मार्गदर्शन शासकीय यंत्रणेमार्फत मिळणार आहे. त्यामुळे या संस्थेला आवश्यक असेल तेव्हा संबंधीत शासकीय अधिकारी / पदाधिकारी भेटी देतील व मार्गदर्शन करतील. या कारणासाठी राज्य शासनाच्या अधिकाऱ्यांना व पदाधिकाऱ्यांना सहकार्य करणे या संस्थेस बंधनकारक राहिल.

६) आरोग्य सेवा संचालनालयाने आरोग्य कार्यक्रमाचा नियमित आढावा घेण्याच्या दृष्टीने काही प्रपत्रे तयार केली आहेत. त्या प्रपत्रामध्ये वेळोवेळी केलेल्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे व नियमितपणे माहिती पाठविणे, तसेच गट स्तरावर, जिल्हा स्तरावर व राज्यस्तरावर आवश्यकतेनुसार बैठकांना हजर रहाणे या संस्थेवर बंधनकारक राहिल. तसेच देण्यात येणाऱ्या अनुदानाचा खर्च कसा झाला याची माहिती शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या पध्दतीनुसार पुरवावी लागेल व ती शासनाच्या अधिकाऱ्यांना केंव्हाही तपासण्यासाठी उपलब्ध करुन द्यावी लागेल. रुग्णालयावरील खर्च नियमाप्रमाणे न झाल्यास हा खर्च शासनाने मान्य न केल्यास संस्थेला दिलेले अनुदान शासनास परत करावे लागेल.

७) संस्थेने नेमावयाच्या अधिकारी व कर्मचाऱ्यांची प्रमाणके सर्वसाधारण शासनाच्या धोरणानुसार व कर्मचाऱ्यांच्या आकृतिबंधानुसार आणि त्या पदांसाठी विहित केलेल्या अर्हतेनुसार राहतील. संस्थेला द्यावयाचे अनुदान, हे आदेश निर्गमित करताना सदर ३ रुग्णालयांवर होणाऱ्या औषधे, उपकरणे, यंत्रसामुग्री, वेतन इत्यादीबाबींवरील खर्चा इतका किंवा संस्थेने प्रत्यक्ष केलेला खर्च यापैकी जी रक्कम कमी असेल त्या प्रमाणात देण्यात येईल किंवा शासकीय अनुदान देण्यासाठी शासनामार्फत तयार करण्यात आलेल्या नियमानुसार देण्यात येईल.

८) संस्थेंचे अधिकारी व कर्मचारी व इतर तांत्रिक कर्मचारी यांचे प्रशिक्षण शासकीय संस्थामध्ये करणे संस्थेवर बंधनकारक राहिल. त्याशिवाय आवश्यकता वाटल्यास संस्थेस हे प्रशिक्षण इतर स्वयंसेवी संस्थेकडून करुन घेता येईल, मात्र त्यावरील खर्च अनुदानासाठी अनुज्ञेय राहणार नाही.

९) शासनामार्फत ग्रामीण भागातील लोकांना ज्या आरोग्य सेवा मोफत देण्यात येतात. त्यावरील आंतररुग्ण व बाह्यरुग्ण सेवेसाठी रुग्णपत्रिका घेताना प्रत्येक रुग्णपत्रिकेमागे प्रचलित शासकीय दराप्रमाणे आकार घेतला जातो. इतर सेवा व उपचार मोफत दिल्या जातात. या तत्वानुसार संस्थेने सेवा देणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

१०) संस्थेला वर नमूद केल्याप्रमाणे देण्यात येणारे अनुदान हे प्रतिपूर्तीच्या स्वरुपात असल्यामुळे संस्थेचे कर्मचारी यांना पगार देणे व इतर अनुज्ञेय बाबींवरील खर्च संस्थेला प्रथमत: करणे आवश्यक राहील. हा खर्च संस्थेस त्यांच्या वार्षिक लेखा परिक्षणाच्या आधारावर वर्षअखेर अनुदान स्वरुपात देण्यात येईल. काही कारणाने एखाद्या वर्षी जास्त दिलेले अनुदान पुढील वर्षाच्या अनुदानात समायोजित करण्यात येईल किंवा ते एक रक्कमी वसूल करावयाचे शासनाने ठरविल्यास संस्थेस ते एक रक्कमी परत करणे बंधनकारक राहिल.

११) या संस्थेकडून ज्या आरोग्य सुविधा जनतेस देण्यात येतील त्या आरोग्य सुविधांच्या बाबतीत उद्भवणारी संपूर्ण जबाबदारी संस्थेची राहिल व त्यासाठी राज्य शासन कोणत्याही परिस्थितीत जबाबदार रहाणार नाही.

१२) शासनाच्या निरनिराळया स्तरावरुन देण्यात येणाऱ्या सूचनांचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

१३) काही कारणास्तव ह्या आरोग्य संस्था चालविणे संस्थेस शक्य न झाल्यास संस्था त्यासाठी शासनाला कमीतकमी ३ महिन्याची नोटीस देऊन इमारती व इतर सर्व मालमत्ता, उपकरणे व आर्थिक तपशिल यासह शासनाकडे सुपूर्द करेल. मात्र अशा परिस्थितीत संस्थेने नियुक्त केलेल्या

कोणत्याही अधिकारी, कर्मचारी वर्गाची जबाबदारी शासन स्विकारणार नाही. संस्थेस चालविण्यासाठी आवश्यक असलेल्या कोणत्याही भांडवली मूळ खर्चाचा किंवा त्याच्या दुरुस्ती व देखभालीचा कोणताही खर्च शासन अनुदानासाठी मंजूर करणार नाही.

१४) प्राथमिक आरोग्य केंद्रात सकाळी व दुपारी बाह्यरूग्णसेवा पुरविण्यात याव्यात, कार्यक्षेत्रातील दुर्गम भागामध्ये लसीकरण व माता बालसंगोपनाबाबतच्या सेवा, विविध राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांशी निगडीत सेवा, अत्यावश्यक सेवा, २४ तास बाळंतपणाच्या सेवा, एकात्मिक बाल विकास कार्यक्रमांतर्गत ० ते ६ वर्षे वयोगटातील बालकांची आरोग्य तपासणी व कुपोषीत बालकांचे उपचार व व्यवस्थापनाकडे विशेष लक्ष पुरविणे, दारिद्र्य रेषेखालील रूग्णांना मोफत सेवा पुरविणे, विविध राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांतर्गत रूग्णांना मोफत रूग्णसेवा पुरविणे, या सेवांपेक्षा अधिकच्या सेवा सशुल्क पुरविण्याबाबत सदर संस्था इच्छूक असल्यास त्याबाबत संस्थेने स्थानिक समुदायाशी सल्लामसलत करून निर्णय घ्यावा.

१५) प्राथमिक आरोग्य केंद्राकरीता शासनाने निश्चित केलेल्या पदांच्या आकृतीबंधानुसार चालविण्यास द्यावयाच्या प्राथमिक आरोग्य केंद्रातील सद्यस्थितीतील आरोग्य विभागाचे कर्मचारी कायम ठेवायचे अथवा त्या संस्थेच्या कर्मचाऱ्यांची कंत्राटी पद्धतीने नियुक्ती करावी याबाबत संस्थेने निर्णय घ्यावा. तथापि, असे कर्मचारी आकृतीबंधानुसारच असावेत व त्यांना शासनाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच देय वेतन देण्यात यावे.

१६) सदर ग्रामीण रूग्णालयाची व प्राथमिक आरोग्य केंद्राची देखरेख व पर्यवेक्षण संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा शल्य चिकित्सक आणि जिल्हा आरोग्य अधिकाऱ्यांमार्फत करण्यात येईल. सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या इतर कार्यक्रम अधिकाऱ्यांकडून प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कार्यवाहीचे पर्यवेक्षण करण्यात येईल, स्वयंसेवी संस्थेस वरिष्ठ स्तरावर वेळोवेळी अहवाल सादर करणे बंधनकारक राहील, जिल्हा / तालुका पातळीवर आरोग्य विभाग, जिल्हा परिषद, पंचायत समिती तसेच इतर विभागांमार्फत आयोजित बैठकांसाठी वेळोवेळी उपस्थित राहणे अनिवार्य असेल.

१७) सदर ३ रूग्णालयांकडून पार पाडण्यात येणाऱ्या कामकाजाचे नियमितपणे मुल्यमापन करण्यात येईल. त्यानुसार विविध आरोग्य सेवांच्या वापराबाबत पुर्वीपेक्षा सुधारणा असावी. तसेच, राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांतर्गत पुरविण्यात येणाऱ्या विविध सेवांची वाढ जवळपास प्रतिवर्षी २० ते २५ टक्के असावी. पुरेशी वाढ दिसून आल्यास स्वयंसेवी संस्थेस पुढील वर्षी प्रोत्साहनात्मक वाढीव २५ टक्के अधिकचा निधी उपलब्ध करून देण्यात येईल.

१८) सदर संस्थेस देय असणाऱ्या अनुदानापैकी प्रत्येक तिमाहीचे अनुदान परिगणित करण्यात येऊन त्यापैकी ७० टक्के अनुदान प्रत्येक तिमाहीच्या अखेरीस किंवा दरमहा अदा करण्यात यावे. उर्वरित ३० टक्के अनुदान वर्षाच्या अखेरीस खर्चाचा ताळमेळ प्राप्त झाल्यानंतर अदा करण्यात यावे.

१९) मनुष्यबळाचे मानधन निश्चित करतांना सदर ग्रामीण रुग्णालय/प्राथमिक आरोग्य केंद्र/उपकेंद्र येथे दि. ०१.०४.२०२३ रोजी देय असलेल्या प्रारंभिक वेतनाशी (सर्व भत्त्यांसह ) समान मानधन निश्चित करण्यात यावे.

३. वरील अटी व शर्ती व्यतिरिक्त शासकीय हित जोपासण्याच्या दृष्टीकोनातून प्रचलित अधिनियम /नियम यामधील आणखी काही अटी विहित करण्याची आवश्यकता असल्यास त्यासह संस्थेसोबत सांमजस्य करार करण्यात यावा.

४. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी महाबळेश्वर तालुक्यातील ग्रामीण रुग्णालय आणि तळदेव व तापोळा येथील २ प्राथमिक आरोग्य केंद्रे याबाबतचा सदर ५ वर्षाच्या कालावधीतील अहवाल शासनास दर ३ महिन्यानी सादर करावा. सदर अहवालानुसार, इंडियन रेड क्रॉस सोसायटी संचलीत पांचगणी (महाबळेश्वर),

जि.सातारा येथील बेल-एअर रुग्णालयास विहित केल्याप्रमाणे खर्चाबाबतचे अनुदान संस्थेस मंजूर करण्यात येईल.

५. यावरील खर्च मागणी क्र.आर-१, "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा, ११०-रुग्णालय व दवाखाने, ११० (४), मुफसल रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदाने, (०३) (०१) अध्यापनेत्तर रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान (२२१० ०१७३), ३१-सहाय्यक अनुदाने या खाली वेळोवेळी करण्यात येणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. प्रस्तुत तरतूद उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्याबाबतची कार्यवाही सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), मुंबई यांनी करावी.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-एक मधील अनुक्रमांक २७ येथील नियम क्र.१४९ आणि परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-तीन मधील अनुक्रमांक ४ येथील नियम क्र.२७ (२) अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०५१७३६१३५२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT,
2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.06.08 11:54:05 +05'30'

(अशोक आत्राम)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,१/२ महाराष्ट्र( लेखा व लेखापरिक्षा )/ ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन व शालेय आरोग्य), पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), मुंबई.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, कोल्हापूर/सातारा.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, कोल्हापूर/सातारा.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर/सातारा
११. इंडियन रेड क्रॉस सोसायटी संचलीत पांचगणी (महाबळेश्वर), जि.सातारा येथील बेल-एअर हॉस्पिटल.
१२. वित्त विभाग (विनियम कार्यासन ) / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती ( आरोग्य-४ ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.